# महाराष्ट्र विधानपरिषद

## चौथे (हिवाळी) अधिवेशन, २०१९

---

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

### वर्धा जिल्हयातील जिल्हा परिषदेच्या प्राथमिक व माध्यमिक शाळेत संच निर्धारण करण्याबाबत

**(१) २१७९८ (२३-०८-२०१६). श्री.अनिल भोसले, श्री.सतिश चव्हाण :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) वर्धा जिल्हयातील जिल्हा परिषदेच्या प्राथमिक व माध्यमिक शाळेत गत पाच वर्षापासून अनेक शाळांमध्ये सन २०१५-१६ चे संच निर्धारण शिक्षणाधिकारी यांच्या हलगर्जीपणामुळे झाले नाही, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, किती शाळांमध्ये संच निर्धारण झाले नाही, तसेच वर्धा जिल्हयात जिल्हा परिषदेच्या प्राथमिक शाळांमधील किती शिक्षक अतिरिक्त झाले आहेत व त्यापैकी किती शिक्षकांचे समायोजन होणे बाकी आहे,
(३) नसल्यास, समायोजनास विलंब होण्याची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२६-०२-२०१९) :** (१) हे खरे नाही.
(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबई उपनगरात तिवरांच्या झाडांची तोड करून भराव टाकून करण्यात येत असलेल्या अनधिकृत बांधकामाबाबत

**(२) २३४७८ (०४-०१-२०१७). श्री.धनंजय मुंडे, श्री.किरण पावसकर, श्री.हेमंत टकले : तारांकित प्रश्न क्रमांक १६२३० ला दिनांक ३० मार्च, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई उपनगरात तिवरांच्या झाडांची तोड करून भराव टाकून करण्यात येत असलेल्या बेकायदा बांधकामाबाबत सन २०१६ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात विधान परिषदेत उपस्थित करण्यात आलेल्या तारांकित प्रश्न क्रमांक १६२३० संदर्भात कोणतीही कार्यवाही केली नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर ठिकाणी होणाऱ्या अनधिकृत भरावास प्रतिबंध करण्याच्या दृष्टीने टेहळणीसाठी महानगरपालिका कर्मचाऱ्यांची तसेच या क्षेत्रात मातीचे व रॅबीटचे ट्रक जावू नये यासाठी महानगरपालिकेतर्फे मोठे चर खणण्यात आल्याचे तसेच सदर भूभाग कायमस्वरूपी अतिक्रमणमुक्त राहण्याच्या दृष्टीने या कांदळवन क्षेत्राभोवती कुंपण घालण्याबाबतची कार्यवाही विचाराधीन असल्याचे मा.मुख्यमंत्री यांनी दिलेल्या उत्तरात नमूद केलेले होते, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर ठिकाणी सद्यःस्थितीत सुध्दा काही अनधिकृत बांधकाम अस्तित्वात आहेत, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन अनधिकृत बांधकाम होताना जाणीवपूर्वक दुर्लक्ष करणाऱ्या महानगरपालिकेच्या संबंधित अधिकारी/कर्मचाऱ्यांवर व अनधिकृत बांधकाम करणाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (०९-०५-२०१९) :** (१) व (२) मुंबई उपनगरात तिवरांच्या झाडांची तोड करुन भराव टाकून करण्यात येत असलेल्या बेकायदा बांधकामाबाबत तारांकित प्रश्न क्र. १६२३० सन २०१६ च्या अर्थसंकल्पिय अधिवेशनात उपस्थित करण्यात आला होता.

सदर प्रश्नावर गृह विभागाकडून उत्तर देण्यात आले होते.

उत्तरामध्ये अनधिकृत भरणीस प्रतिबंध करण्याच्या दृष्टीने टेहाळणीसाठी महानगरपालिका कर्मचाऱ्यांची नेमणूक करण्यात आली असल्याचे, त्या क्षेत्रात मातीचे व रॅबीटचे ट्रक जावू नये यासाठी महानगरपालिकेमार्फत मोठे चर खणण्यात आली असल्याचे तसेच सदर भूभाग कायमस्वरुपी अतिक्रमण मुक्त राहण्याच्या दृष्टीने कांदळवन क्षेत्राभोवती कुंपण घालण्याची कार्यवाही विचाराधीन असल्याचे नमूद करण्यात आले हाते, हे खरे आहे.

(३) व (४) महानगरपालिका व महसूल विभागाच्या मदतीने कांदिवली (प.) येथील कांदळवनामधील अनधिकृत बांधकामाबाबत मे, २०१६ नंतर एकूण ७ वेळा निष्कासन कारवाई करण्यात आली. सदर कारवाईमध्ये १४१ निवासी, ३६६ कच्ची व ७८ अनिवासी अशी एकूण ५८५ बांधकामे निष्कासित करण्यात आली आहेत. अतिक्रमण धारकांवर पर्यावरण संरक्षण अधिनियम, १९८६ अंतर्गत गुन्हे नोंदविण्यात आले आहेत. त्यामुळे अधिकारी व कर्मचारी यांच्यावर कारवाईचा प्रश्न उद्‌भवत नाही.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## दुष्काळग्रस्त शेतकऱ्यांच्या थकीत अनुदान वाटपाबाबत

**(३) २४५१५ (३०-१२-२०१६). श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.धनंजय मुंडे : तारांकित प्रश्न क्रमांक २२७४२ ला दिनांक २६ जुलै, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) परभणी जिल्ह्यातील दुष्काळग्रस्त शेतकऱ्यांना देण्यात येणाऱ्या आर्थिक मदतीपैकी फळपीके, बागायती व कापूस पिकांसाठी देण्यात येणारी आर्थिक मदतीचे वाटप माहे सप्टेंबर, २०१६ अखेरही न झाल्यामुळे शेतकरी आर्थिक मदतीपासून वंचित राहीले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मागील वर्षाच्या दुष्काळग्रस्त शेतकऱ्यांच्या प्रलंबित अनुदान वाटपाबाबत शासनाने आर्थिक मदत जाहीर करून शेतकऱ्यांना मदत वाटप करण्याबाबत कोणती कार्यवाही करण्यात येत आहे,

(३) असल्यास, तालुकानिहाय थकीत रक्कम, लाभार्थी शेतकरी यांची

थोडक्यात माहिती काय आहे,
(४) असल्यास, किती मुदतीत सदरील आर्थिक अनुदान शेतकऱ्यांना वाटप करण्यात येणार आहे ?

**श्री.सुभाष देशमुख (०९-०४-२०१९) :** (१), (२) व (३) खरीप २०१५ मधील परभणी जिल्ह्यातील बाधित शेतकऱ्यांना कापूस पिकासाठी महसूल व वन विभाग, शासन निर्णय दिनांक ६/०१/२०१७ अन्वये रूपये ७८.७० कोटी अनुदान उपलब्ध करून देण्यात आले होते. त्यापैकी रुपये ६८.८५ कोटी इतकी रक्कम २१८०३९ बाधित लाभार्थी शेतकरी यांना वितरीत करण्यात आली आहे.

तसेच फळपीक व बागायती पिकासाठी महसूल व वन विभाग, शासन निर्णय दिनांक १९/०४/२०१७ अन्वये परभणी जिल्ह्याकरीता रूपये ४८.७९ कोटी अनुदान उपलब्ध करून देण्यात आले होते. त्यापैकी रूपये ४५.१२ कोटी इतकी रक्कम ५२९०१ पात्र लाभार्थी शेतकरी यांना वितरीत करण्यात आली आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मोर्शी-वरूड (जि.अमरावती) तालुक्यातील दुष्काळग्रस्त शेतकऱ्यांच्या मागण्यांबाबत

**(४) २४८३३ (३०-१२-२०१६). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.किरण पावसकर, श्री.हेमंत टकले :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मोर्शी-वरूड (जि.अमरावती) तालुक्यातील दुष्काळग्रस्त शेतकऱ्यांना हेक्टरी रूपये ५० हजार मदत शासनाने जाहीर करावी, संत्रा फळांचा शालेय पोषण आहारात समावेश करण्यात यावा, स्वामीनाथन आयोग लागू करण्यात यावा असा ठराव ग्रामसभेत मंजूर करण्याच्या मागणीचे निवेदन बळीराजा संत्रा उत्पादक संस्थेने मा.मुख्यमंत्री यांच्याकडे माहे ऑगस्ट, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान देण्यात आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त शेतकऱ्यांच्या मागणीच्या निवेदनावर शासनाने निर्णय

घेऊन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (०९-०४-२०१९)** : (१) निवेदनाची नोंद ही ई-ऑफीस प्राविष्ठामध्ये आढळून आली नाही.
(२) व (३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## बनोटी, सावळदबारा व जरडी (ता.सोयगांव, जि.औरंगाबाद) या आरोग्य केंद्रांना निधी उपलब्ध करुन देण्याबाबत

**(५) २५२०६ (१६-१२-२०१६). श्री.सतिश चव्हाण, श्री.धनंजय मुंडे** : सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) बनोटी, सावळदबारा व जरडी (ता.सोयगांव, जि.औरंगाबाद) या आरोग्य केद्रांतर्गत २३ आरोग्य उपकेंद्रे असून ८७ गावातील नागरिकांना सोई-सुविधा देणेचे नियोजन आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, निधी अभावी सदर आरोग्य केंद्राच्या रुग्ण समितीच्या ६ महिन्यापासून बैठका झाल्या नाहीत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (१४-०६-२०१९)** : (१) होय, हे खरे आहे.
(२) हे खरे नाही.

सदर तिन्ही प्राथमिक आरोग्य केंद्राना निधी उपलब्ध करून देण्यात आलेला आहे.

प्राथमिक आरोग्य केंद्र, बनोटी रूग्ण कल्याण समितीची दिनांक २९/१२/२०१६ व दिनांक २३/१०/२०१७ रोजी बैठक घेण्यात आली.

प्राथमिक आरोग्य केंद्र, सावळदबारा रूग्ण कल्याण समितीची दिनांक २९/१२/२०१६, दिनांक ०५/१२/२०१७ व दिनांक ४/७/२०१८ रोजी बैठक घेण्यात आली.

प्राथमिक आरोग्य केंद्र, जरंडी रूग्ण कल्याण समितीची दिनांक १५/१०/२०१६, दिनांक १०/११/२०१७ व दिनांक ३१/७/२०१८ रोजी बैठक घेण्यात आली.

सन २०१६-१७ व २०१७-१८ या आर्थिक वर्षाच्या बैठका नियमित झालेल्या आहेत. प्राथमिक आरोग्य केंद्र, बनोटी येथील रूग्ण कल्याण समितीच्या बैठकीचे नियोजन माहे फेब्रुवारी, २०१९ मध्ये केलेले आहे.

(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात खरीप हंगामात नुकसानग्रस्त फळबाग शेतकऱ्यांना नुकसान भरपाई देण्याबाबत

**(६) २५५८३ (३०-१२-२०१६). श्री.आनंदराव पाटील, श्री.रामहरी रुपनवर, श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात सन २०१५-१६ या हंगामात कमी पाऊस झाल्यामुळे ज्या भागात ५० पैसे पेक्षा कमी पैसेवारी होती त्या भागात खरीप पिकासाठी शेतकऱ्यांना पीक नुकसान भरपाई देण्यात आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, खरीप हंगामात फळबागांचे मोठ्या प्रमाणात नुकसान होऊन फळपिकांना नुकसान भरपाई देण्यात आली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून पीक नुकसान भरपाईच्या धर्तीवर फळपिकांना नुकसान भरपाई देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (०८-११-२०१९) :** (१) हे खरे आहे.

महसूल व वन विभाग, शासन निर्णय, दिनांक ३१ डिसेंबर, २०१५

अन्वये राज्यातील सन २०१५-१६ च्या दुष्काळसदृश्य परिस्थितीच्या अनुषंगाने बाधित झालेल्या १५७४७ गावातील शेतकऱ्यांना कृषी विषयक मदत वाटप करण्यासाठी निविष्ठा अनुदानाकरीता एकूण रुपये ३५७८.८३ कोटी निधी उपलब्ध करून देण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.
(२) हे खरे नाही.
(३) पुणे विभागातील सातारा, सांगली व पुणे जिल्ह्यांमध्ये, नाशिक विभागातील जळगाव व धुळे जिल्ह्यांमध्ये तसेच औरंगाबाद विभागातील सर्व जिल्ह्यांमध्ये नुकसानग्रस्त फळबाग शेतकऱ्यांना नुकसान भरपाई देण्यात आली आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबईतील खोत पध्दत बंद करून जमिनी ताब्यात घेणेबाबत

**(७) २६१२३ (३०-१२-२०१६). श्री.सुजितसिंह ठाकूर :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबईतील ४४४ एकर ३ गुंठे जागा शासनाने सन १९४९ मध्ये खोत पध्दत बंद करुन ताबा घेणेबाबत कायदा मंजूर करुनही त्याची अंमलबजावणी केली नसल्याचे दिनांक २२ ऑक्टोबर, २०१६ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदरहू कायद्यानुसार शासनाने जमीन ताब्यात न घेतल्याने मुंबईतील विकासकांनी खोतांकडून जमीन अल्प किंमतीत ताब्यात घेतली, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त भूखंड शासनाने अद्याप ताब्यात न घेण्याची कारणे काय आहेत, तसेच किती निश्चित कालावधीत सदरहू जमीन शासनाकडून ताब्यात घेणे अपेक्षित आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१०-०५-२०१९) :** (१), (२) व (३) खोती जमिनीच्या अनुषंगाने मौजे भांडूप येथील १९३ एकर २५ गुंठे ०८ आणे एवढी जमीन सरकारी म्हणून जिल्हाधिकारी, उपनगर यांच्या दिनांक २७/११/१९५३ च्या आदेशान्वये दाखल करण्यात आली होती. या आदेशाविरुध्द संबंधितांनी

मा.उच्च न्यायालयात दाखल केलेल्या सुट क्र.४८१/१९५३ व ८३१/१९५४ मध्ये झालेल्या समझोता कराराप्रमाणे शासन जमा केलेल्या जमिनी पुन्हा खोतांच्या नावे दाखल करण्यात आल्याचे दिसून येते.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पुणे जिल्ह्यातील सेंद्रिय शेतीस प्रोत्साहन देण्यासाठी निधी उपलब्ध करण्याबाबत

**(८) २६९२८ (१५-०४-२०१७). श्री.अनिल भोसले, श्री.किरण पावसकर :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) पुणे जिल्ह्यात रासायनिक शेतीला पर्याय म्हणून जिल्हा परिषदेमार्फत राबविण्यात येणाऱ्या सेंद्रिय शेतीस शेतकऱ्यांकडून चांगला प्रतिसाद मिळत असून या योजनेसाठी जिल्हा परिषदेने जिल्हा नियोजन समितीकडे माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान रूपये दोन कोटी एवढ्या निधीची मागणी केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून सेंद्रिय शेतीस प्रोत्साहन देणाऱ्या या योजनेसाठी आवश्यक निधी उपलब्ध करुन देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०७-११-२०१९) :** (१) होय.
(२) जिल्हा परिषद, पुणे यांनी कृषी विभागांतर्गत नाविन्यपूर्ण योजनेतून नैसर्गिक सेंद्रिय शेतीस प्रोत्साहन योजना सन २०१७-१८ मध्ये जिल्हा नियोजन समितीमार्फत निधी मिळण्यासाठी जिल्हाधिकारी तथा जिल्हा नियोजन अधिकारी, पुणे यांचेकडे प्रस्ताव सादर केलेला असून त्या अनुषंगाने जिल्हा नियोजन समितीकडे निधीची मागणी केलेली आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## नागपूर जिल्ह्याचे माध्यमिक विभागाचे तत्कालीन शिक्षणाधिकारी

## यांच्या बोगस कारभाराची चौकशी करण्याबाबत

**(९) ३०५११ (०४-०८-२०१२). श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर जिल्ह्याचे माध्यमिक विभागाचे तत्कालीन शिक्षणाधिकारी श्री.बाबा पाटील यांच्या बोगस कारभाराची चौकशी शासनाने सुरु केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार संबंधितांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी केव्हापर्यंत चौकशी पूर्ण होणे अपेक्षित आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**ॲड. आशिष शेलार (०८-११-२०१९) :** (१) होय.
(२), (३) व (४) श्री.बा.ह.पाटील, तत्कालीन शिक्षणाधिकारी (माध्य.) जि.प.नागपूर यांच्याविरुध्द दिनांक २१/१२/२०११ च्या शासन ज्ञापनान्वये दोषारोपपत्र बजाविण्यात येऊन विभागीय चौकशीची कारवाई सुरु करण्यात आली असून त्यांच्यावरील दोषारोपांची रितसर विभागीय चौकशी करण्याकरीता दिनांक १९/०३/२०१२ च्या आदेशान्वये चौकशी अधिकाऱ्याची नियुक्ती करण्यात आली आहे, चौकशी अहवाल अप्राप्त आहे.

---

## औरंगाबाद जिल्हा परिषद प्राथमिक आरोग्य केंद्रामधील वैद्यकीय अधिकाऱ्यांची रिक्त पदे भरण्याबाबत

**(१०) ३२१७४ (१८-०८-२०१७). श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) औरंगाबाद जिल्हा परिषद आरोग्य विभागांतर्गत जिल्ह्यात ५० प्राथमिक आरोग्य केंद्रांमध्ये १०७ वैद्यकीय अधिकाऱ्यांची पद मान्यता असून सदर

पदापैकी एकूण ३० पदे रिक्त आहेत, हे खरे आहे काय,
(२) तसेच, सन २०१२ मध्ये जिल्हा परिषदेला मिळालेल्या ५० रुग्णवाहिकांची दूरवस्था झालेली असून दुर्गम भागातून रुग्णांना शहराकडे नेण्यासाठी गैरसोय होत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, वैद्यकीय अधिकाऱ्यांची ३० पदे रिक्त असल्याने दुर्गम/ग्रामीण भागात रुग्णांना वैद्यकीय सेवा मिळण्यास अडचण येते यासाठी शासनाने उक्त प्रकरणी चौकशी करुन वैद्यकीय अधिकाऱ्यांची रिक्त पदे भरणेसाठी व नवीन रुग्णवाहिका उपलब्ध करण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (२६-०८-२०१९) :** (१) हे अंशत: खरे आहे.

औरंगाबाद जिल्हा परिषद, आरोग्य विभागांतर्गत जिल्ह्यात ५० प्राथमिक आरोग्य केंद्रांसाठी वैद्यकीय अधिकारी संवर्गाची १०९ पदे मंजूर असून सद्य:स्थितीत ९५ पदे भरलेली व १४ पदे रिक्त आहेत.
(२) हे खरे नाही.
(३) राज्यातील वैद्यकीय अधिकारी गट-अ संवर्गातील रिक्त पदे नियमितरित्या भरण्याकरीता दिनांक २७/१२/२०१८ रोजी ८७७ पदांची जाहिरात प्रसिध्द केली असून पुढील कार्यवाही सुरु आहे. तसेच वैद्यकीय अधिकारी गट-अ (ग्रेड पे रुपये ५४००/-) संवर्गाची रिक्त पदे कंत्राटी तत्वावर भरण्याबाबत जिल्हास्तरावर जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखाली समितीस अधिकार प्रदान करण्यात आले असून त्यानुसार पद भरती सुरु आहे.

उपसंचालक, परिवहन पुणे यांचेकडे ३० नवीन रुग्णवाहिका खरेदीचा प्रस्ताव जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांनी सादर केला आहे.
(४) प्रश्नच उद्‌भवत नाही.

---

## राज्यात इयत्ता ५ वीच्या अतिरिक्त प्रशिक्षक पदवीधर

## शिक्षकांचे समायोजन करण्याबाबत

**(११) ३३०९६ (११-०८-२०१७). डॉ.सुधीर तांबे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात शिक्षण हक्क कायदा लागू केल्यापासून इयत्ता ५ वीला शिकविणारे अतिरिक्त प्रशिक्षक पदवीधर शिक्षक यांचे समायोजन होणे शक्य नसल्याने संबंधित कर्मचाऱ्यांना जिल्हा परिषदेकडे वर्ग करण्यासंदर्भात शासनाने निर्णय घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, तसेच त्याचा तपशील काय आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२६-०२-२०१९) :** (१) व (२) होय, हे खरे आहे.

शासन निर्णय, दिनांक ०४/१०/२०१७, शासन पत्र दिनांक २२/१२/२०१७, दिनांक ३१/०८/२०१८, दिनांक ०४/०९/२०१८ व दिनांक १५/११/२०१८ अन्वये ज्या जिल्ह्यात खाजगी शाळांमध्ये पदे रिक्त नाहीत तेथे स्थानिक स्वराज्य संस्थातील रिक्त पदी तात्पुरते समायोजन करण्यात आले आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील माध्यमिक शाळांमध्ये कला व क्रीडा शिक्षकांची रिक्त पदे भरण्याबाबत

**(१२) ३३१२६ (११-०८-२०१७). श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील माध्यमिक शाळांमध्ये कला व क्रीडा शिक्षकांची अनेक पदे मागील दोन वर्षापासून रिक्त असल्याचे माहे मार्च, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कला व क्रीडा शिक्षकांची पदे भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२६-०२-२०१९) :** (१) हे अंशत: खरे आहे.

(२) व (३) शासन निर्णय, दिनांक २३/०६/२०१७ नुसार शिक्षक पद भरतीबाबत पवित्र प्रणालीची कार्यपध्दतीबाबत धोरणात्मक निर्णय शासनाने घेतला आहे व त्यानुसार पवित्र प्रणाली मार्फत पद भरतीची कार्यवाही सुरु आहे.

---

## मानवत रोड ते पाथरी या दरम्यानच्या रेल्वे मार्गाचे काम पूर्ण करण्याबाबत

**(१३) ३३८३७ (०७-०८-२०१७). श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मानवत रोड ते पाथरी दरम्यानच्या पहिल्या टप्प्यातील १६ कि.मी. रेल्वे मार्गाचे काम पूर्ण करण्याबाबत परभणी येथील स्थानिक लोकप्रतिनिधींनी सन २०१६ मध्ये वा त्यादरम्यान मा.मुख्यमंत्री यांच्याकडे लेखी निवेदन सादर केले होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याबाबत प्रधान सचिव, परिवहन यांनी दिनांक ३ मार्च, २०१७ रोजी वा त्यासुमारास अर्धशासकीय पत्रान्वये रेल्वे मंत्रालयाकडे शिफारस केली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, याबाबत रेल्वे मंत्रालयाने केलेल्या कार्यवाहीबाबत राज्य शासनास कोणती माहिती दिली आहे,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सदर रेल्वे मार्गाचे काम पूर्ण करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (०८-०३-२०१९) :** (१) होय.

(२) विशेष कार्यकारी अधिकारी, गृह विभाग (परिवहन) यांच्या दिनांक ४/२/२०१६ च्या पत्राद्वारे रेल्वे मंत्रालयास विनंती करण्यात आली आहे.

(३) व (४) राज्यातील विविध रेल्वे मार्गाचे तसेच रेल्वे प्रकल्पाच्या

अंमलबजावणीबाबत रेल्वे मंत्रालयाच्या अधिकाऱ्यांसमवेत वेळोवेळी शासन स्तरावर बैठका घेवून पाठपुरावा करण्यात येतो.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## माध्यमिक शाळेतील शिक्षकांना अतिरिक्त ठरविल्याबाबत

**(१४) ३४०७६ (१८-०८-२०१७). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) माध्यमिक शाळेतील इयत्ता ५ वी, इयत्ता ६ ते ८ वी तसेच इयत्ता ९ वी व १० वी अश्या ३ उपखंडाकरीता शिक्षक संख्या स्वतंत्रपणे मंजूर केली, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, इयत्ता ५ वी करीता मंजूर शिक्षक संख्येपेक्षा कार्यरत शिक्षक जास्त असल्यास, अपदवीधर प्रशिक्षित शिक्षकच अतिरिक्त ठरत असून अपदवीधर प्रशिक्षितांऐवजी प्रशिक्षित पदवीधर शिक्षण सेवकास सेवामुक्त करण्यात आले, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२६-०२-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) हे अंशत: खरे आहे.
(३) अतिरिक्त ठरविल्याबाबत संबंधित शिक्षकांनी समायोजनापूर्वी आक्षेप घेतला असल्यास त्याप्रकरणी विभागीय शिक्षण उपसंचालक स्तरावर सुनावणी घेण्यात आली. शिक्षक अतिरिक्त ठरत नसतील अशा प्रकरणी त्यांचे समायोजन करण्यात येवू नये असे निर्णय संबंधित विभागीय शिक्षण उपसंचालक यांनी दिलेले आहेत.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुख्याध्यापक पदावर सेवा सुरक्षा असणेबाबत

**(१५) ३६१०० (०२-०१-२०१८). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) स्थानिक स्वराज्य संस्थांच्या शाळामध्ये पटसंख्येच्या अभावी दिनांक २८ ऑगस्ट, २०१५ व माहे ऑगस्ट, २०१६ च्या शासन निर्णयानुसार मुख्याध्यापकाचे पद कमी करण्याची तरतूद असून मुख्याध्यापकाचे पद कमी झाल्यावर तसेच १०० पेक्षा कमी पटसंख्या झाल्यावर खाजगी अनुदानित शाळेतील मुख्याध्यापकास सेवा सुरक्षा असून स्थानिक स्वराज्य संस्थांच्या शाळेतील मुख्याध्यापकांच्या पदाला सेवा सुरक्षा नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, स्थानिक स्वराज्य संस्थांच्या मुख्याध्यापकामध्ये अन्यायाची भावना निर्माण झाल्याने शिक्षक आघाडी अमरावती यांनी खाजगी शाळांप्रमाणे स्थानिक स्वराज्य संस्थांच्या मुख्याध्यापकांना सेवा सुरक्षेच्या मागणीबाबत निवेदने केली होती, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२६-०२-२०१९) :** (१) हे खरे नाही.

(२), (३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## कोरेगाव-भिमा (जि.पुणे) येथील विजयस्तंभाच्या दुरवस्थेबाबत

**(१६) ३७४७३ (०२-०१-२०१८). श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कोरेगाव-भिमा (जि.पुणे) येथील विजयस्तंभाची दुरवस्था झाली असल्याचे

माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार कोरेगाव भिमा येथील विजयस्तंभाची दुरुस्ती व सोयीसुविधा उपलब्ध करुन देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ.सुरेश (भाऊ) खाडे (१४-०७-२०१९) :** (१) नाही.

(२) कोरेगाव भिमा येथील विजयस्तंभाच्या जागेबाबत वाद असून सदर जागेवर दिवाणी न्यायालयाचे जैसे थे आदेश आहेत.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात कौशल्य विकास योजनेंतर्गत प्रधानमंत्री महिला शक्ती केंद्र योजना राबविण्याबाबत

**(१७) ३८३७७ (०६-०४-२०१८). ॲड.राहुल नार्वेकर, श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर, श्री.प्रकाश गजभिये, ॲड.निरंजन डावखरे, श्री.किरण पावसकर :** सन्माननीय **महिला व बालविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात कौशल्य विकास योजनेंतर्गत प्रधानमंत्री महिला शक्ती केंद्र योजना राबविण्यात येणार आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त योजनेची केंद्रे किती कालावधीत सुरु करण्यात येणार आहेत,

(३) असल्यास, सदर योजनेची उद्दिष्टे काय आहेत व या योजनेचा महिलांना किती कालावधीत लाभ मिळणार आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२८-०२-२०१९) :** (१) होय.

(२) केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार “महिला शक्ती केंद्र” योजना राज्यामध्ये सुरु करण्याचे प्रस्तावित आहे.

(३) “महिला शक्ती केंद्र” या योजनेंतर्गत विद्यार्थी/स्वयंसेवक यांच्यामार्फत ग्रामीण महिलांच्या सक्षमीकरणासाठी शासनामार्फत राबविण्यात येणाऱ्या कौशल्य विकासाच्या विविध योजना/कार्यक्रम व प्रशिक्षणासंदर्भात ग्रामीण स्त्रियांना त्यांच्या अधिकारांचा लाभ घेण्यासाठी सरकारकडे जाण्यासाठी राज्य, जिल्हा आणि ब्लॉक पातळीवर महिलांच्या सक्षमीकरणाच्या दृष्टीने एक यंत्रणा उपलब्ध करण्याचे प्रस्तावित आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नांदेड जिल्ह्यातील प्राथमिक आरोग्य केंद्रात रुग्णांना पिण्यासाठी पाणी मिळत नसल्याबाबत

**(१८) ३८५४९ (०४-०४-२०१८). श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नांदेड जिल्ह्यातील मालेगांव प्राथमिक आरोग्य केंद्राला पाण्याचा तुटवडा भासत असल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्राथमिक आरोग्य केंद्रात रुग्णांना पिण्यासाठी पाणी मिळत नसल्याने त्यांची गैरसोय होत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, त्यानुषंगाने रुग्णांना पिण्यासाठी पाणी मिळण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (२५-०२-२०१९) :** (१) हे अंशत: खरे आहे.
बोअरवेलचे पाणी उन्हाळ्यात बंद झाल्याने पाण्याची टंचाई निर्माण झाली होती. परंतु खाजगी पाण्याची व्यवस्था करण्यात आली होती.
(२) हे अंशत: खरे आहे.
पाण्याची टंचाई असली तरी खाजगी पाण्याची व्यवस्था करण्यात येते.

(३) सद्य:स्थितीत प्राथमिक आरोग्य केंद्र मालेगांव येथे एक बोअर घेण्यात आली आहे. सदरील बोअर पासून पाईप लाईन करुन रुग्णांकरीता पिण्याच्या पाण्याची व वापराच्या पाण्याची व्यवस्था करुन देण्यात आली आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## अपंगाचे प्रमाणपत्र ऑनलाईन व जिल्हयाच्या ठिकाणी मिळण्याबाबत

**(१९) ३८८७० (०४-०४-२०१८). डॉ.सुधीर तांबे, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर, अॅड.हुस्नबानू खलिफे, श्री.आनंदराव पाटील, श्री.विक्रम काळे, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.बाळाराम पाटील, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अपंगाचे प्रमाणपत्र मिळविण्यासाठी राज्यातील अपंग व्यक्तींना मुंबईतील महालक्ष्मी येथे अलियावर जंग येथे यावे लागते, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, त्यानुषंगाने अपंगाचे प्रमाणपत्र ऑनलाईन व जिल्हयाच्या ठिकाणी मिळण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (२२-०२-२०१९) :** (१) हे खरे नाही.

मुंबई व उपनगरामध्ये दिव्यांग लाभार्थीना मुंबई जे.जे. रूग्णालय समूह आणि ऑल इंडीया इन्स्टिट्युट ऑफ फिजीकल मेडीसीन अॅण्ड रिहॅबिलीटेशन हाजी अली मुंबई व उपनगर येथे अलीयावर जंग नॅशनल इन्स्टिट्युट ऑफ स्पीच अॅण्ड हिअरिंग डिसअॅबिलीटिज (दिव्यांगजन) बांद्रा, मुंबई येथे दिव्यांगत्व प्रमाणपत्रे दिली जातात.
(२) राज्यातील उर्वरित सर्व जिल्हयाच्या ठिकाणी जिल्हा रूग्णालय/सामान्य

रूग्णालय येथे ऑनलाईन दिव्यांगत्व प्रमाणपत्र मिळण्याची सुविधा उपलब्ध करून देण्यात आलेली आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## ग्रुपग्रामपंचायत भोगाव हद्दीतील मौजे भोगाव (खु.) व मौजे भोगाव (बु) (ता.पोलादपूर, जि.रायगड) येथे सौरऊर्जेवर चालणारे दिवे मंजूर होणेबाबत

**(२०) ४०६४२ (०४-०४-२०१८). श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) ग्रुपग्रामपंचायत भोगाव हद्दीतील मौजे भोगाव (खु.) व मौजे भोगाव (बु)(ता.पोलादपूर, जि.रायगड) येथे सौरऊर्जेवर चालणारे दिवे मंजूर होणेबाबत लोकप्रतिनिधींनी मा.ऊर्जा मंत्री यांना दिनांक १२ जानेवारी, २०१८ रोजी वा त्यासुमारास लेखी निवेदन दिले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या निवेदनानुसार शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, त्यांचे स्वरुप काय आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (१४-०८-२०१९) :** (१) होय.
(२) सौर ऊर्जेवर आधारित पथदिवे आस्थापित करण्यासाठी केंद्र शासन अथवा राज्य शासनाची कोणतीही योजना अस्तित्वात नसल्याने महाऊर्जामार्फत निधी उपलब्ध करुन देणे शक्य नाही. परंतु सन २०१८-१९ मध्ये रायगड जिल्हा नियोजन समितीकडे महाऊर्जामार्फत जिल्ह्यामध्ये विविध अपारंपारीक ऊर्जा साधने आस्थापित करण्यासाठी आराखडा सादर करण्यात आला होता. परंतु त्यानुसार महाऊर्जाला केणत्याही प्रकारचा निधी प्राप्त झाला नाही. महाऊर्जाकडून सन २०१९-२० मध्ये रायगड जिल्हा नियोजन समितीकडे

पुन:श्च निधीची मागणी करण्यात येत असून निधी प्राप्त झाल्यास सौर ऊर्जेवर आधारित पथदिवे आस्थापित करण्याचे नियोजित आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## कोल्हापूर जिल्हयात मौखिक आरोग्य तपासणीमध्ये कर्करोगाची पूर्वलक्षणे आढळून आल्याबाबत

**(२१) ४०७५३ (०४-०४-२०१८). श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.आनंदराव पाटील, आर्कि.अनंत गाडगीळ :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) कोल्हापूर जिल्हयात शासनाने माहे डिसेंबर, २०१७ मध्ये केलेल्या मौखिक आरोग्य तपासणीमध्ये ३ हजार ८४२ नागरीकांमध्ये कर्करोगाची पूर्वलक्षणे आढळून आली, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, त्यातील ९१० रुग्णांना तोंडाचा कर्करोग झाला असल्याने त्यांचे तोंडच उघडता येत नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, जिल्हयातील या रोगाचे वाढते प्रमाण चिंताजनक असल्याने सदरील रुग्णांच्या पुढील तपासण्या करुन त्यांच्यावर उपचार करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (२५-०२-२०१९) :** (१) हे अंशत: खरे आहे.
कोल्हापूर जिल्हयात ३१०१ इतक्या लोकांमध्ये कर्करोगाची पुर्वलक्षणे आढळून आली आहेत.
(२) हे खरे नाही.
(३) मौखिक आरोग्य तपासणी मोहिमेमध्ये कोल्हापूर जिल्हयातील ७९ रुग्ण

बायोप्सीसाठी संदर्भित केले होते व त्यापैकी १५ रुग्णांचे मौखिक कर्करागाचे निश्चित निदान झाले. सदर रुग्णांवर औषधोपचार सुरु आहेत.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## सांगली जिल्हा परिषदेतील कृषी विभागाला स्वीय निधी, विशेष घटक, बायोगॅस, पीक संरक्षण यासाठी निधी मिळत असल्याबाबत

**(२२) ४०८८३ (०४-०४-२०१८). श्री.मोहनराव कदम, श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सांगली जिल्हापरिषदेतील कृषी विभागाला स्वीय निधी, विशेष घटक, बायोगॅस, पीक संरक्षण, यासाठी वर्षाला ३ कोटी ३४ लाखाचा निधी मिळत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, अधिकारी-कर्मचारी यांचे वेतन, प्रवासभत्ते, कार्यालयीन खर्च इ. साठी वर्षाला रुपये ३ कोटी ८६ लाख खर्च होत असून येथे योजनांपेक्षा प्रशासकीय खर्च अधिक होत असल्याने शेतकऱ्यांना त्याचा त्रास होत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, प्रशासकीय खर्चाची शासनाने चौकशी करुन तो नियंत्रित करण्यासोबतच येथील शेतकऱ्यांना योजनांसाठी आवश्यक निधी उपलब्ध करुन देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०८-११-२०१९) :** (१) होय.

(२) सदर योजनांवर आकृती बंधानुसार पदे मंजूर असून त्याप्रमाणे अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन व भत्ते अदा केले जाते. तसेच योजनेसाठी प्राप्त अनुदानातून योजनेवर खर्च केला जातो.

(३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पिंपळगाव ढाळे (ता.बार्शी, जि.सोलापूर) मध्यम प्रकल्प कॅनॉलमध्ये गेलेल्या जमिनीचा मोबदला शेतकऱ्यांना मिळणेबाबत

**(२३) ४०९६५ (०४-०४-२०१८). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पिंपळगाव ढाळे (ता.बार्शी, जि.सोलापूर) या मध्यम कॅनॉल प्रकल्पासाठी शेतकऱ्याच्या जमीन संपादित केलेल्या आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या प्रकल्पासाठी संपादित केलेल्या बागायती जमिनीचा मोबदला मिळणेसाठी शेतकरी संघटनांकडून मागणी करण्यात येत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन संपादित बागायती जमिनीचा मोबदला देणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (१९-०८-२०१९) :** (१) होय.

(२) होय.

(३) प्रकल्पाच्या कालव्यासाठी भूसंपादन करावयाचे एकूण क्षेत्र १०० हे. आर इतके असून त्यापैकी आजपर्यंत भूसंपादन केलेल्या ६२.२२ हे.आर. क्षेत्रासाठी संबंधितांना रु.२१.७१ कोटी इतकी मोबदल्याची रक्कम अदा करण्यात आली आहे. उर्वरित ३७.७८ हे.आर. क्षेत्रासाठी संयुक्त मोजणी करुन थेट खरेदीने करावयाचा भूसंपादनाचा प्रस्ताव जिल्हाधिकारी कार्यालयास ३/२०१८ मध्ये सादर करण्यात आला असून सदर प्रस्ताव जिल्हाधिकारी यांच्या बैठकीमध्ये मंजूर झाल्यानंतर क्षेत्र खरेदी करण्यात येईल.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## कन्नड (जि.औरंगाबाद) तालुक्यात बनावट प्रमाणपत्र बनवणारी टोळी कार्यरत असल्याबाबत

**(२४) ४१०७७ (०६-०४-२०१८). श्री.सुभाष झांबड :** सन्माननीय **कामगार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कन्नड (जि.औरंगाबाद) तालुक्यातील विविध ग्रामपंचायतींनी दिलेल्या आणि औरंगाबाद कामगार उपायुक्त कार्यालयात दाखल झालेल्या ४६ मजुर असल्याच्या प्रमाणपत्रांपैकी ४२ प्रमाणपत्रे बनावट असल्याचे दिनांक १५ नोव्हेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, कन्नड तालुक्यात बनावट प्रमाणपत्र तयार करणारी टोळी कार्यरत असण्याची शक्यता आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन बनावट प्रमाणपत्र बनवून देणाऱ्या टोळीचा शोध घेऊन त्यांच्यावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील - निलंगेकर (२३-०५-२०१९) :** (१) हे अंशत: खरे आहे.

औरंगाबाद कामगार उप आयुक्त कार्यालयात कन्नड तालुक्यातील विविध ग्रामपंचायतींच्या नावे दिलेल्या ४६ प्रमाणपत्रांची खातरजमा केली असता त्यातील ६ प्रमाणपत्रे संबंधित ग्रामसेवकांनी अदा केली आहेत. तर उर्वरीत ४० प्रमाणपत्रे ग्रामसेवकांनी अदा केली नसल्याचे निदर्शनास आले.

(२) व (३) बनावट प्रमाणपत्र तयार करणे प्रकरणी पोलीस यंत्रणेमार्फत शोध घेऊन कार्यवाही करणेबाबत दिनांक ३ ऑगस्ट, २०१८, दिनांक ४ ऑक्टोबर, २०१८ रोजीच्या पत्रान्वये मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद औरंगाबाद यांना व दिनांक १४ मार्च, २०१९ रोजीच्या पत्रान्वये प्रधान सचिव (ग्रामविकास विभाग) यांना कळविले आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## कामगार विमा योजना रुग्णालयात आरोग्य सेवा सुविधा पुरविण्याबाबत

**(२५) ४१२८९ (०२-०८-२०१८). प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कामगार व त्यांचे कुटुंबिय यांना आरोग्य सेवा पुरविण्याकरीता कामगार विमा योजना रुग्णालयाची स्थापना करण्यात आली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या ठिकाणी कोणत्या सुविधा उपलब्ध आहेत, विशेषत: डायलेसिस ही सुविधा उपलब्ध आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने डायलेसिस ही सुविधा उपलब्ध करुन देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (०३-०६-२०१९) :** (१) हे खरे आहे.

(२) व (३) राज्य कामगार विमा योजनेंतर्गत प्राथमिक व विशेषज्ञ वैद्यकीय उपचार हे शासनामार्फत पुरविण्यात येत असून अतिविशिष्ट वैद्यकीय उपचार हे राज्य कामगार विमा महामंडळामार्फत पुरविण्यात येतात. त्यानुषंगाने, सद्य:स्थितीत प्राथमिक वैद्यकीय उपचार हे ६०७ विमा वैद्यकीय व्यवसायी, ५२ सेवा दवाखाने व १४ अधिकृत औषध विक्रेते यांच्यामार्फत पुरविण्यात येत असून विशेषज्ञ वैद्यकीय उपचार हे ११ राकावियो रुग्णालयांमार्फत पुरविण्यात येतात. तसेच, अतिविशिष्ट वैद्यकीय उपचाराकरीता राज्य कामगार विमा महामंडळ, नवी दिल्ली यांच्या मार्फत एकूण १०४ खाजगी रुग्णालयांशी टाय-अप करण्यात आलेले आहे. तथापि, डायलेसिस ही सुविधा अतिविशिष्ट वैद्यकीय उपचारामध्ये मोडत असल्याने सदर सुविधा ही राज्य कामगार विमा महामंडळ, नवी दिल्ली यांच्या मार्फत टाय-अप करण्यात आलेल्या खाजगी रुग्णालयांमार्फत पुरविण्यात येते.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील विविध कामगार संघटनांनी प्रलंबित मागण्यांबाबत आझाद मैदानावर आंदोलन केल्याबाबत

**(२६) ४१३९२ (०२-०८-२०१८). श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, अॅड.राहूल नार्वेकर, श्री.आनंद ठाकूर, श्री.ख्वाजा बेग :** सन्माननीय **कामगार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील विविध कामगार संघटनांनी कामगारांवर होणारे अन्याय व प्रलंबित मागण्यासाठी माहे मे, २०१८ च्या पहिल्या सप्ताहात महाआंदोलन केल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर कामगार संघटनाच्या मागण्या कोणत्या आहेत तसेच उक्त मागण्यांपैकी कोणकोणत्या मागण्या पूर्ण करण्यात आल्या आहेत,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील - निलंगेकर (२७-०२-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) कामगार संघटनांच्या मागण्या खालीलप्रमाणे.

१. सर्व कामगारांना दरमहा रुपये १८,०००/- किमान वेतन मिळालेच पाहिजे.

२. वाढती महागाई त्वरीत रोखा व सार्वजनिक रेशन व्यवस्था व्यापक व बळकट करा.

३. कंत्राटी पध्दत बंद करा व समान कामाला समान वेतन द्या.

४. देशात नोकऱ्यांची उपलब्धता वाढवा व बेरोजगारी रोखा.

५. सार्वजनिक वाहतूक सेवा आधुनिकीकरण करुन सतत चालू राहिलीच पाहिजे.

६. सर्व कामगार व कर्मचाऱ्यांना तसेच शेतकऱ्यांना रुपये ३०००/- निवृत्ती वेतन द्या.

७. बोनस, भविष्य निर्वाहनिधी, ग्रॅच्युईटी कायद्यातील सिलींग रद्द करा व ३० दिवसांची ग्रॅच्युईटी मिळाली पाहिजे.

८. सार्वजनिक धंद्याचे खाजगीकरण बंद करा.

९. सुरक्षा,रेल्वे व आर्थिक केंद्रात परकीय भांडवलाचा प्रवेश बंद करा.

१०. कामगार कायद्यातील प्रस्थापित कामगार विरोधी बदल रद्द करा.

११. कामगार संघटना नोंदणी अर्ज दाखल झाल्यापासून ४५ दिवसांत

नोंदणी करा.

१२. आयएलओच्या कन्व्हेंशन ८७ व ९८ रॅटीफिकेशनला मान्यता द्या.

१३. सर्वांना सामाजिक सुरक्षा मिळालीच पाहिजे.

१४. महाराष्ट्रातील सर्व शेतकऱ्यांची सरसकट कर्ज माफी झालीच पाहिजे

निवेदनातील बहुतांशी मागण्या केंद्र शासनाच्या व धोरणात्मक स्वरुपाच्या असून त्यातील कंत्राटी कामगार पध्दतीचे निर्मुलन व किमान वेतन निश्चित करणेबाबत नियमानुसार कार्यवाही करण्यात येते.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## अकोला, वाशिम व बुलढाणा जिल्ह्यातील प्रकल्प अपूर्ण अवस्थेत असल्याबाबत

**(२७) ४१५४४ (०१-०८-२०१८). श्री.गोपिकिशन बाजोरीया :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अकोला जिल्ह्यातील नेर-धामणा, उमा बॅरेज, हिवरा शहापूर व अंदुरा संग्राहक, सुकळी संग्राहक, कंचनपुर बृहत, कवठा व शहापूर तसेच वाशिम व बुलढाणा जिल्ह्यातील प्रकल्प अपूर्ण अवस्थेत असल्याचे माहे एप्रिल, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, वरील प्रकल्पांपैकी काही प्रकल्प भूसंपादनाअभावी प्रलंबित आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकल्पांना सुधारित प्रशासकीय मान्यता न मिळाल्यामुळे प्रकल्पाच्या खर्चात भरमसाठ वाढ होत आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने प्रकल्प पूर्ण करण्याच्यादृष्टीने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (१७-०५-२०१९) :** (१) अकोला जिल्हयातील ३ मध्यम व ७ लघु, बुलढाणा जिल्हयातील ३ मोठे व १० लघु आणि वाशिम जिल्हयातील २२ लघु प्रकल्प अपूर्ण अवस्थेत आहे.

(२) अकोला जिल्हयातील कंचनपुर, बुलढाणा जिल्हयातील जिगांव, खडकपूर्णा, आलेवाडी चोंढी आणि वाशिम जिल्हयातील खडकी, उमरी बृहत ल.पा., कंझारा हे प्रकल्प भूसंपादना अभावी प्रलंबित आहेत. प्रकल्पाकरीता आवश्यक जमिनीच्या संपादनाची कार्यवाही प्रगती पथावर आहे. त्याकरीता विभागीय आयुक्त, अमरावती यांचेस्तरावरुनही बैठका आयोजित करुन भूसंपादन प्रक्रियेस गती देण्यात येत आहे.

(३) नाही. जमिनीचे वाढीव दर, संकल्पनातील बदल, दरसूचीतील वाढ, यामुळे प्रकल्पाच्या किंमतीत वाढ संभवत आहे.

(४) चौकशीचा प्रश्न उद्‌भवत नाही. तथापि, प्रकल्प पूर्ण करण्याच्या दृष्टीने भूसंपादनाची कार्यवाही प्रगती पथावर आहे. तसेच अडचणीचे निराकरण वेळोवेळी करण्यात येत आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## माढा (जि.सोलापूर) ग्रामीण रुग्णालयातील अनेक समस्याबाबत

**(२८) ४१९६७ (०२-०८-२०१८). श्री.रामहरी रुपनवर, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.शरद रणपिसे, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.आनंदराव पाटील :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) माढा (जि.सोलापूर) ग्रामीण रुग्णालयात अनेक समस्या असल्याचे माहे एप्रिल, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मागील दोन वर्षापासून रिक्त पदे भरलीच गेली नसल्यामुळे त्याचा ताण इतर अधिकारी व कर्मचारी यांचेवर पडत असून रुग्णांच्या उपचारावर परिणाम होत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, मागील चार वर्षापासून लाखो रुपयांची डिजिटल एक्स-रे मशीनही बंद आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन चौकशीच्या अनुषंगाने रिक्त पदे भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (०६-०६-२०१९) :** (१) हे अंशत: खरे आहे.
(२) हे अंशत: खरे आहे.

एकूण २८ पदांपैकी १७ पदे भरली असून ११ पदे रिक्त आहेत. रिक्त पदी कार्यरत अधिकारी/कर्मचारी यांचेकडे अतिरिक्त कार्यभार देण्यात आला असून नियमित रुग्णसेवा देण्यात येत आहे.
(३) हे खरे नाही.

क्ष-किरण तंत्रज्ञाचे पद ज्या कालावधीसाठी रिक्त होते तेवढ्याच कालावधीसाठी एक्स-रे मशीन बंद होती. तथापि रिक्त पदी प्रतिनियुक्तीने क्ष-किरण तंत्रज्ञ उपलब्ध करुन दिल्याने सदर सेवा सुरळीत सुरु आहे.
(४) वैद्यकीय अधिक्षक गट-अ (ग्रे.पे. ६६००) या पदासाठी पदोन्नतीने व नामनिर्देशनाने पदभरती करण्याची कार्यवाही सुरु आहे. वर्ग-३ व ४ ची पदे भरणेबाबतची कार्यवाही उपसंचालक, पुणे यांचे स्तरावर सुरु आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## महाळुंग (जि.सोलापूर) येथील प्राथमिक आरोग्य केंद्राचे बांधकाम निकृष्ट दर्जाचे असल्याबाबत

**(२९) ४१९७० (०२-०८-२०१८). श्री.रामहरी रुपनवर, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.शरद रणपिसे, श्री.आनंदराव पाटील, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) महाळुंग (जि.सोलापूर) येथील प्राथमिक आरोग्य केंद्राचे बांधकाम अर्धवट

स्थितीत व निकृष्ट दर्जाचे झाले असून याबाबतची तक्रार ग्रामपंचायतीने जिल्हा परिषदेकडे केली असल्याचे माहे एप्रिल, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने दोषी आढळून येणाऱ्या संबंधितांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?
**श्री.एकनाथ शिंदे (१९-०८-२०१९) :** (१) हे खरे नाही.
(२) सदर बांधकामाबाबत चौकशी करण्यात आली असून, महाळुंग ता.माळशिरस (जि.सोलापूर) येथे नवीन प्राथमिक आरोग्य केंद्राचे बांधकाम सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मापदंडानुसार चालू असून सदर बांधकाम ९० टक्के पूर्ण झाले आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## महाराष्ट्रातील नगरपालिकांमधील रिक्त अधिकाऱ्यांची पदे भरण्याबाबत

**(३०) ४२०४७ (३०-०८-२०१३). श्री.गोपीकिसन बाजोरीया :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यामधील अ, ब, क व ड दर्जाच्या महानगरपालिका हद्दीमध्ये मोठ्या प्रमाणात अतिक्रमण व अनधिकृत बांधकामे होत आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, मोठ्या प्रमाणात होत असलेले अतिक्रमण व अनधिकृत बांधकामे महानगरपालिकेमधील सहाय्यक नगर रचनाकार, नगर रचनाकार, सहाय्यक संचालक नगर रचनाकार ही निर्माण केलेली पदे मोठ्या प्रमाणात रिक्त असल्यामुळे होत आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, अनेक नगरपरिषदांमधील मुख्याधिकाऱ्यांची पदे सुध्दा रिक्त आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, रिक्त असलेल्या मुख्याधिकारी पदाचा अतिरिक्त प्रभार नायब तहसिलदाराकडे देण्यात येतो मात्र कामाच्या प्रचंड ताणामुळे नायब तहसिलदार मुख्याधिकारी पदाचा अतिरिक्त कार्यभार सांभाळू शकत नाहीत,

हे ही खरे आहे काय,
(५) असल्यास, उपरोक्त अधिकाऱ्यांची रिक्त असलेली पदे भरण्यासंदर्भात शासनस्तरावरुन काय कार्यवाही सुरु आहे ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२०-०३-२०१९) :** (१) महानगरपालिका क्षेत्रातील अतिक्रमण व अनधिकृत बांधकामावर उपलब्ध मनुष्यबळाच्या आधारे वेळोवेळी कारवाई करण्यात येते.
(२) हे खरे नाही.
(३), (४) व (५) मुख्याधिकारी संवर्गाची १२३ पदे भरण्याबाबत आवश्यक कार्यवाही सुरु आहे.

नगरपालिकेचे दैनंदिन कामकाज सुरळीत राहण्याकरीता उपलब्धतेनुसार तहसिलदार अथवा नायब तहसिलदार यांच्याकडे अतिरिक्त कार्यभार सोपविण्यात येतो.

---

## उरण (जि.रायगड) तालुक्यातील प्रदुषणावर नियंत्रण आणण्याबाबत

**(३१) ४२१६२ (०१-०८-२०१८). श्री.बाळाराम पाटील, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **पर्यावरण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) उरण (जि.रायगड) तालुक्यात एनएमडी, ओएनजीसी, भारत गॅस, विद्युत प्रकल्प, जेएनपीटी बंदर, जीटीआय तसेच सिंगापूर पोर्ट, जेएनपीटी सेझ प्रकल्प व एमएमआरडीएसारखे महत्वाचे प्रकल्प निर्माण होत असल्याने देशातील सर्वात वेगाने विकसित होणारे शहर म्हणून उरणची ओळख होऊ लागली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त परिसरात नैसर्गिक साधनसंपत्तीचा ऱ्हास (नष्ट) होत असून नाल्याचे गटारात रूपांतर झाल्याने हवेतील प्रदूषणाबरोबर धुळीकणांचे प्रमाण वाढले असल्याने उरण तालुक्यातील अनेक नागरिकांना हृदयविकाराचा त्रास होऊ लागला असून सन २०१६ या वर्षापासून सुमारे २८ नागरिक हृदयविकाराच्या झटक्याने मृत्यू पावले आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, स्थानिक नागरिकांना आरोग्याच्या सुविधा उपलब्ध करून

देण्यात स्थानिक प्रशासन विभाग, सिडको अकार्यक्षम ठरले असून पर्यावरणाकडे शासनाचे व महाराष्ट्र प्रदूषण मंडळाचे दुर्लक्ष होत आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन उरण तालुक्यातील प्रदुषणांवर नियंत्रण आणण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.रामदास कदम (२१-०२-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) हे खरे नाही.

हवा प्रदूषण नियंत्रण सयंत्रणा सुधारण्याकरिता म.प्र.नि. मंडळाने उरण परिसरातील १२ स्टोन क्रशरना हवा (प्र व प्रनि कायदा १९८१ चे ३१ अन्वये) प्रस्तावित आदेश बजावले होते, तद्नंतर दिनांक ०६/०४/२०१८ दरम्यान जसई गावातील एकूण ११ स्टोन क्रशरला बंदचे आदेश पारित केलेले आहेत.

जिल्हा आरोग्य अधिकारी, अलिबाग यांचे दिनांक ०८/१२/२०१७ च्या पत्रान्वये उरण तालुक्यातील प्राथमिक आरोग्य केंद्र कोप्रोली याच्या कार्यक्षेत्रात जानेवारी, २०१६ ते नोव्हेंबर, २०१७ पर्यंत ५७ मृत्यू हृदयविकाराने झाले आहेत असे कळविले आहे परंतु स्वयंस्पष्ट कारण नमुद केलेले नाही.

(३) हे खरे नाही.

(४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात केंद्रीय श्रम मंत्रालयाचे राष्ट्रीय स्वास्थ विमा योजना बंद असल्याबाबत

**(३२) ४२३०५ (०२-०८-२०१८). डॉ.सुधीर तांबे, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.विक्रम काळे, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात केंद्रीय श्रम मंत्रालयाची राष्ट्रीय स्वास्थ विमा योजना गेली ३

वर्षापासून बंद असल्याची कारणे काय आहेत,
(२) तसेच, आयुष्यमान भारत योजनेची सुरुवात केव्हापासून करण्यात येणार आहे व या योजनेत महात्मा फुले योजनेचा समाविष्ट करण्यात येणार आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?
**श्री.एकनाथ शिंदे (२२-०२-२०१९) :** (१), (२) व (३) दिनांक ०१/०४/२०१५ पासून राष्ट्रीय स्वास्थ विमा योजना केंद्र शासनाच्या श्रम व रोजगार मंत्रालयाकडून केंद्रीय आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाकडे हस्तांतरीत करण्यात आली. केंद्र शासनाकडून राष्ट्रीय स्वास्थ विमा योजना राबविण्याच्या अनुषंगाने धोरण ठरविण्याची कार्यवाही सुरू होती.

केंद्र शासनाने राष्ट्रीय स्वास्थ विमा योजनेचे रूपांतर प्रधानमंत्री जन आरोग्य योजनमध्ये करून सदर योजना दिनांक २३/०९/२०१८ पासून राबविण्याच्या निर्णय घेतला. त्यास अनुसरून शासन निर्णय, दिनांक २१/०९/२०१८ नुसार प्रधानमंत्री जन आरोग्य योजना महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेसह दिनांक २३/०९/२०१८ पासून पहिल्या टप्प्यामध्ये राज्यातील शासकीय रूग्णालयामध्ये सुरू करण्यात आली आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मौजे आहेरवाडी (जि.सोलापूर) येथील शेतजमिनीची नुकसान भरपाई मिळणेबाबत

**(३३) ४३५८२ (०२-०८-२०१८). श्री.प्रविण दरेकर, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मौजे आहेरवाडी (जि.सोलापूर) येथील शेतजमीन गट नं. २३६/१, २३६/२, २४० ते २४४/१, २०४ ते २४४/१०, २०४ ते २४४/१क, २०४ ते २४४ ड या जमिनीची नुकसान भरपाईची रक्कम मिळणेबाबत संबधीत जमीन मालकांनी मा.महसूल राज्यमंत्री यांना दिनांक १ जून, २०१८ रोजी वा त्यासुमारास लेखी

निवेदन दिले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या प्रकरणी प्रांताधिकारी, सोलापूर यांना कार्यवाही व्हावी, असे आदेश मा.महसूल राज्यमंत्री यांनी दिले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (२७-०५-२०१९) :** (१) व (२) होय, हे खरे आहे.

(३) सदर प्रकरण हे न्यायप्रविष्ट आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## कोलाड (ता.रोहा, जि.रायगड) जवळील धरणाच्या डावा व उजवा तीर कालव्याची दुरवस्था झाल्याबाबत

**(३४) ४३५९५ (०१-०८-२०१८). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कोलाड (ता.रोहा, जि.रायगड) जवळील डोलवहाळ येथील कुंडलिका नदीत रायगड पाटबंधारे विभागाकडून धरणाच्या माध्यमातून डावा व उजवा तीर अशी कालव्यांची निर्मिती करून शेतीसाठी मुबलक प्रमाणात पाण्याची व्यवस्था करण्यात आली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर कालव्याची देखभाल, सुरक्षा, स्वच्छतेकडे दुर्लक्ष झालेले असून पावसाळ्यात डोंगर दऱ्यातून वाहत येणाऱ्या पाण्यामुळे कालव्याची दुरवस्था झाली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर भागातील शेतकऱ्यांना कालव्यातून शेतीसाठी मिळणारे पाणी बंद झाले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, सदर कालव्याच्या दुरूस्तीसाठी व शेतकऱ्यांना शेतीसाठी पाणी मिळण्यासाठी शासनाने कोणती कार्यवाही उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (२२-०४-२०१९) :** (१) होय.
(२) अंशत: खरे आहे.
कालवा अतिपर्जन्य प्रदेशात असल्याने वेळोवेळी दुरूस्ती करून शेतकऱ्यांना शेतीसाठी पाणी उपलब्ध करून देण्यात येते.
(३) नाही.

(४) अष्टमी शाखा कालव्याच्या विमोचक द्वार दुरूस्तीसाठी पाचवेळा ई-निविदा प्रसिध्द करूनसुध्दा या कामासाठी ठेकेदार उपलब्ध झालेले नाहीत. त्यामुळे अष्टमी शाखा कालव्यामधून विमोचकांच्या दुरस्त्या अभावी शेतीसाठी पाणी सोडले जात नाही.
अष्टमी शाखा कालव्याची मोठी दुरूस्ती वगळता व रोहा शाखा कालव्यावरील वार्षिक किरकोळ दुरूस्तीची कामे वगळता, काळ सिंचन प्रकल्पाच्या कालव्यावर कोणतीही मोठी दुरूस्तीची कामे प्रलंबित नाहीत.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात तुकडाबंदी कायदा रद्द करणेबाबत

**(३५) ४३६०९ (३०-०८-२०१३). श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात तुकडाबंदी कायदा हा कालबाह्य झाल्याने तो रद्द करण्यात यावा असा प्रस्ताव जिल्हा प्रशासनाच्यावतीने राज्य शासनाकडे पाठविला गेला असल्याचे दिनांक ८ मे, २०१३ रोजी वा त्यासुमारस निदर्शनास आले, हे खरे आहे काय
(२) असल्यास, सदरील प्रस्तावावर शासनाने कर्नाटक राज्यात तुकडाबंदी कायदा रद्द केला आहे त्याच धर्तीवर महाराष्ट्रातील कायदा रद्द करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२५-१०-२०१९) :** (१) नाही.
(२) उक्त प्रस्ताव अप्राप्त आहे. यास्तव सदर कायदा रद्द करण्याची बाब उद्‌भवत नाही.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## अकोट तालुक्यांतर्गत अनेक प्रकल्पाची कामे अत्यंत निकृष्ट दर्जाचे झाल्याबाबत

**(३६) ४४५३३ (०५-१२-२०१८). श्री.विप्लव बाजोरिया :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अकोला नेरधामणा, उमा बॅरेज, हिवरा शहापूर, वृहन, वाई संग्राहक, नया अंदुरा संग्राहक, सुकळी संग्राहक, कंचनपूर बृहत, कवठा बॅरेज, काटीपाटी बॅरेज, शहापूर (ता.अकोट) इत्यादी प्रकल्पांचे कामे अत्यंत निकृष्ट दर्जाचे झालेले असल्याचे माहे सप्टेंबर, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकल्पांचे काम करतांना कंत्राटदारांना आगाऊ रक्कम देण्यात आली आहे तसेच उपरोक्त प्रकल्पांपैकी अनेक प्रकल्पांची कामे सुधारित प्रशासकीय मान्यता न मिळाल्यामुळे प्रलंबित आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, मोठ्या प्रमाणात निधी खर्च करुनही अत्यंत कमी जमीन सिंचनाखाली येणार आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकल्पांना आजपर्यंत शासनाने एकूण किती निधी मंजूर केला व प्रत्यक्षात किती निधी खर्च करण्यात आला आहे,
(५) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (१७-०५-२०१९) :** (१) नाही.

(२) उक्त प्रकल्पांपैकी पूर्णा बॅरेज-२ (नेरधामणा), उमा बॅरेज व शहापूर बृहत ल.पा.यो. च्या कंत्राटदारास आगाऊ रक्कम देण्यात आली असून संबंधित विभागाने वसूल केलेली आहे. उमा बॅरेज प्रकल्पातील कंत्राटदारास दिलेल्या मशिनरी ॲडव्हान्स पैकी रु.७५.७० लक्ष मुद्दल व दिनांक १२/११/२०१२ पासून व्याजाची वसुली बाकी आहे.

उमा बॅरेज व काटीपाटी बॅरेज प्रकल्पांची तसेच शहापूर बृहत ल.पा. प्रकल्पाची वितरण प्रणालीची कामे सु.प्र.मा.अभावी प्रलंबित आहेत

(३) नाही.

(४) (रु. कोटी)

| संबंधित प्रकल्पास प्राप्त निधी | मार्च-२०१८ पर्यंत प्राप्त झालेली तरतूद | मार्च-२०१८ पर्यंत झालेला खर्च |
|---|---|---|
| एकूण :- | १४०३.८८ | १४०३.८८ |

विषयांकित बांधकामाधीन प्रकल्पांसाठी सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षात रुपये ११४.०६ कोटी निधी उपलब्ध असून नोव्हेंबर, २०१८ पर्यंत रु.७२.०५ कोटी खर्च झालेला आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

(६) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना शालेय शिक्षण विभागाच्या धर्तीवर कालबध्द पदोन्नती देण्याबाबत

**(३७) ४४७४७ (०५-१२-२०१८). श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण, श्री.दत्तात्रय सावंत, डॉ.सुधीर तांबे, श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील विमुक्त जातीच्या आश्रमशाळेतील कार्यरत लिपिक/ सेवक/

कामाठी/ स्वयंपाकी/ वसतिगृह अधिक्षक/प्रयोगशाळा सहाय्यक/परिचर/नाईक इत्यादी शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना शालेय शिक्षण विभागाच्या धर्तीवर कालबध्द पदोन्नती देण्याबाबत मा.उच्च न्यायालयाने निर्णय दिला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राम शिंदे (११-०४-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) व (३) राज्यातील विजाभज प्रवर्गाच्या आश्रमशाळेतील शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना शालेय शिक्षण विभागाच्या धर्तीवर कालबध्द पदोन्नती देण्याबाबत मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्णयानुसार या विभागाने शासनपत्र दिनांक १०/०३/२०१६ अन्वये ज्या न्यायालयीन प्रकरणांमध्ये मा.उच्च न्यायालयाने याचिकाकर्ता कर्मचाऱ्यांना कालबध्द पदोन्नती योजनेचा लाभ देण्याबाबतचे निर्देश दिले आहेत अशा कर्मचाऱ्यांची वैयक्तीक पात्रता शालेय शिक्षण विभागाच्या दिनांक ३०/०४/१९९८ च्या शासन निर्णयानुसार तपासून जर याचिकाकर्ता कर्मचारी कालबध्द पदोन्नती योजनेस पात्र ठरत असल्यास त्यांना सदरहू योजनेचा लाभ देण्याची कार्यवाही करण्याचे निर्देश देण्यात आले आहेत.

---

## मौजे कोलशेत येथील प्रस्तावित बस स्टेशन आरक्षणाच्या फेरबदलाबाबत

**(३८) ४४७५२ (०५-१२-२०१८). ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) ठाणे महानगरपालिका हद्दीतील मौजे कोलशेत येथील मंजूर विकास योजनेनुसार प्रस्तावित बस स्टेशन क्र. १ या आरक्षणाच्या फेरबदलाबाबत विधान परिषद लोकप्रतिनिधींनी (कोकण पदवीधर) प्रधान सचिव, नगरविकास विभाग १ यांना दिनांक २९ ऑगस्ट, २०१८ रोजी निवेदन देऊन मागणी केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त आरक्षणाच्या फेरबदलाबाबत शासनाने निर्णय घेवून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०३-०४-२०१९) :** (१) होय.
(२) ठाणे शहराच्या मंजूर विकास योजनेमध्ये आरक्षण क्र.१- बस स्टेशन या आरक्षणापैकी ठाणे महानगरपालिकेच्या ताब्यात आलेल्या क्षेत्रावरील बस स्टेशनचे आरक्षण वगळून ते म्युनिसिपल पर्पज याकरीता आरक्षित करण्याचा महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ चे कलम ३७ चा प्रस्ताव आयुक्त, ठाणे महानगरपालिका यांनी शासनास दिनांक ३/५/२०१८ च्या पत्रान्वये मान्यतेकरीता सादर केला आहे. सदर प्रस्तावावर संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अभिप्राय शासनास प्राप्त झाले असून, सदर प्रकरणी शासनस्तरावरुन छाननी पूर्ण करुन अंतिम निर्णय शासनाकडून संकल्पित आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील अनुसूचित जाती आणि नवबौध्द समाजातील दारिद्रयरेषेखालील भूमिहीन कुटुंबाना मोफत शेतजमीन मिळणेबाबत

**(३९) ४५२५६ (०५-१२-२०१८). श्री.प्रविण दरेकर, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील अनुसूचित जाती आणि नवबौध्द समाजातील दारिद्रय रेषेखालील भूमिहीन कुटुंबांना कर्मवीर दादासाहेब गायकवाड सबलीकरण व स्वाभिमान योजनेंतर्गत मोफत शेत जमीन देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर योजनेंतर्गत मोफत जमीन देण्याच्या या योजनेसाठी संबंधित कुटुंब भूमिहीन असणे आवश्यक आहे, हे ही खेर आहे काय,
(३) असल्यास, काही कुटूंबांकडे इनाम जमिनीचे एक ते दोन एकराचे तुकडे

आहेत तर काही कुटुंबांकडे त्याहीपेक्षा कमी जमीन असून ते अत्यल्प भूधारक शेतमजुर असले तरी भूमिहीन या निकषात बसत नसल्याने मोठ्या प्रमाणात गरीब कुटूंबे या योजनेपासून वंचित राहत आहेत, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने निकषामध्ये शिथीलता आणण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?
**डॉ. सुरेश (भाऊ) खाडे (१६-१०-२०१९) :** (१) व (२) हे खरे आहे.
(३) हे खरे नाही.
(४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात भूसंपादनासाठी बाजारमुल्य दरानुसार मोबदला देण्याबाबत

**(४०) ४५९२२ (३०-११-२०१८). ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) शासनाने दिनांक १३ ऑगस्ट, २०१८ रोजी अध्यादेश काढून भूसंपादनासाठी बाजारमूल्य दरानुसारच मोबदला द्यावा असा निर्णय घेण्यात आला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदरहू निर्णयानुसार राज्यात किती ठिकाणी अंमलबजावणी करण्यात आली वा येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२२-०२-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.
दिनांक १३ ऑगस्ट, २०१८ रोजीचा अध्यादेश नसून दिनांक १३ ऑगस्ट, २०१८ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये निर्णय घेण्यात आला आहे.
(२) कोकण, पुणे, नाशिक, अमरावती, औरंगाबाद, नागपूर या सर्व विभागात सदर निर्णयाची अंमलबजावणी करण्यात येत आहे.
उपरोक्त सर्व विभागात सर्व जिल्हाधिकारी यांचे मार्फत विविध प्रकल्पांसाठी सार्वजनिक प्रयोजनाकरीता संपादित करण्यात येणाऱ्या जमिनीसाठी मोबदला निश्चित करताना उक्त शासन निर्णयानुसार कार्यवाही

करण्यात येते.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात इलेक्ट्रीक वाहनांसाठी चार्जिंग स्टेशन बसविण्याबाबत

**(४१) ४६०२१ (३०-११-२०१८). ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात इलेक्ट्रीक वाहनांना प्राधान्य दिले जात असून शासनाने इलेक्ट्रीक वाहनांसाठी चार्जिंग स्टेशन बसविण्याची योजना केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन राज्यात इलेक्ट्रीक वाहनांसाठी चार्जिंग स्टेशन बसविण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (०६-०५-२०१९) :** (१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाव्दारे दिनांक १४/०२/२०१८ च्या शासन निर्णयानुसार राज्याचे इलेक्ट्रिक व्हेईकल प्रोत्साहन धोरण, २०१८ नुसार व केंद्र शासनाच्या चार्जिंग स्टेशनबाबतच्या मार्गदर्शक तत्वानुसार चार्जिंग स्टेशन उभारण्यात येत आहेत.

(२) इलेक्ट्रिक वाहनांसाठी चार्जिंगच्या सुविधा पुरविण्याकरीता राज्यातील महावितरण कंपनीला राज्य समन्वय अभिकरण म्हणून नियुक्त करण्यात आले आहे.

महावितरणने विविध ठिकाणी जसे महावितरण कार्यालये, उपकेंद्रातील अतिरिक्त जागेमध्ये ५०० विद्‌युत वाहन चार्जिंग केंद्र उभारण्याचे नियोजित आहे. सदर प्रकरण महावितरणतर्फे टप्प्या-टप्प्यात राबविण्यात येत असून प्रथम टप्प्यात ५० विद्‌युत वाहन चार्जिंग केंद्र विविध शहरामध्ये महावितरणच्या उपकेंद्रामध्ये उपलब्ध असलेल्या अतिरिक्त जागेमध्ये उभारण्यात येणार असून याकरीता महावितरणव्दारे निविदा प्रसारित आली असून पुढील कार्यवाही करण्यात येत आहे. तसेच पुणे येथील पॅराडीगम

उपकेंद्र बानेर व नागपूर येथील अमरावती रोड उपकेंद्र येथे प्रत्येकी एक जलद DC चार्जिंग केंद्र प्रायोगीक तत्वावर महावितरणव्दारे उभारण्यात आले आहे.

इलेक्ट्रिक वाहनांच्या चार्जिंगकरीता बॅकबे आगारात व वरळी आगारात बेस्ट मार्फत चार्जिंग युनिट बसविण्यात आलेले आहे. तसेच टाटा पॉवर कंपनीमार्फत राज्यात १०० चार्जिंग केंद्र उभारण्याचे प्रस्तावित असून आतापर्यंत मुंबईत २० चार्जिंग केंद्र उभारण्यात आलेली आहेत.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## शासकीय प्राथमिक आरोग्य केंद्रात वैद्यकीय अधिकाऱ्याबाबत घेतलेला निर्णय

**(४२) ४६०६२ (०५-१२-२०१८). श्री.नरेंद्र दराडे :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शासकीय प्राथमिक आरोग्य केंद्रात कर्तव्यावर असलेला वैद्यकीय अधिकारी विनापरवानगी गैरहजर राहिल्यास उपचारा अभावी रुग्णाचा किंवा प्रसूति दरम्यान मातेचा अथवा बालकाचा मृत्यू झाल्याचे निदर्शनास आल्यास संबंधित वैद्यकीय अधिकाऱ्याला तात्काळ निलंबित करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, वैद्यकीय अधिकाऱ्याला सेवेतून निलंबित करण्यात आल्यानंतर महाराष्ट्र मेडिकल कौन्सीलकडे अशा डॉक्टरांची नोंदणी रद्द करण्याची शिफारसही शासन करणार आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन आतापर्यंत किती वैद्यकीय अधिकाऱ्यांवर कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत, तसेच उक्त निर्णयाच्या अंमलबजावणीची सद्यःस्थिती काय आहे ?

**श्री.एकनाथ शिंदे (०१-०६-२०१९) :** (१) व (२) होय, असे निर्देश दि.०१/९/२०१८ च्या शासन परिपत्रकान्वये देण्यात आले आहेत.

(३) व (४) उपरोक्त परिपत्रकान्वये सूचित करण्यात आल्यानंतर आरोग्य सेवा संचालनालयांतर्गत असलेल्या आठपैकी कोणत्याही मंडळात परिपत्रकात नमूद

केलेली घटना घडल्याचे आढळून आलेले नाही. त्यामुळे कोणत्याही वैद्यकीय अधिकाऱ्यावर कारवाई करण्याचा प्रश्न उद्भवलेला नाही.

---

## शेतकऱ्यांना कर्ज देणाऱ्या बेकायदा सावकारी करणाऱ्या सावकारावर कारवाई करण्याबाबत

**(४३) ४६०८४ (०५-१२-२०१८). श्री.गिरीशचंद्र व्यास, प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.रामदास आंबटकर :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शासनाने शेतकऱ्यांना जिल्हा मध्यवर्ती बँक व शासकीय बँकेच्या माध्यमातून कर्ज वाटप केलेले असून ते अत्यल्प प्रमाणात आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शेतकऱ्यांना बँकेतर्फे मिळणारा कर्ज पुरवठा अत्यल्प असल्याने व शासनाचे वेळवर अनुदान मिळत नसल्याने खाजगी सावकाराकडून कर्ज घ्यावे लागते, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, अशाप्रकारे खाजगी सावकारांकडून अव्वाच्या सव्वा पटीने व्याज आकारून खाजगी सावकार शेतकऱ्यांची पिळवणूक करीत असल्याने शासनाने उपरोक्त प्रकरणी चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार संबंधित दोषींवर शासनाकडून कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (०३-०५-२०१९) :** (१) नाही.

राज्यातील बँकांनी पात्र शेतकऱ्यांना खरीप २०१८ चे हंगामामध्ये दिनांक ३०/०९/२०१८ अखेर ३०,५१,३७२ शेतकऱ्यांना रुपये २२,९८०.२० कोटीचे पीककर्ज वाटप केले आहे. सदर वाटप लक्षांकाच्या ५२ % असून खरीप २०१७ च्या तुलनेत कर्जवाटपात ७ % ने वाढ झाली आहे. तसेच, खरीप २०१७ च्या तुलनेत शेतकऱ्यांच्या संख्येत २० % नी वाढ झालेली आहे.

(२) व (३) नाही.

महाराष्ट्र सावकारी (नियमन) अधिनियम २०१४ या अधिनियमातील

तरतुदीप्रमाणे परवाना प्राप्त करुन सावकारी करणे वैध आहे. तथापी विनापरवाना सावकारी करणे अवैध असून यासंदर्भात तक्रार अर्ज प्राप्त झाल्यास सर्व संबंधित सहाय्यक / उपनिबंधक (सावकारी), जिल्हा निबंधक (सावकारी) तसेच विभागीय निबंधक (सावकारी) यांचेस्तरावरुन कारवाई करण्यात येते.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## डहाणू (जि.पालघर) येथील अनेक आदिवासी पाडे सोयी सुविधांपासून वंचित असल्याबाबत

**(४४) ४६८६६ (०६-०७-२०१९). श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) डहाणू तालुक्यातील दुर्गम भागात वसलेले अनेक आदिवासी पाडे अजूनही प्राथमिक सुविधा (रस्ते, शाळा, वीज, पाणी व रुग्णालय इ.) पासून वंचित असल्याची बाब माहे एप्रिल, २०१९ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, तद्नुसार उक्त तालुक्यातील दुर्गम भागात वसलेल्या आदिवासी पाड्यांना प्राथमिक सुविधा देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, तसेच सदर सोयी सुविधा किती कालावधीत देण्यात येणार आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. अशोक उईके (०५-११-२०१९) :** (१), (२) व (३) डहाणू तालुक्यात ठक्कर बाप्पा आदिवासी वस्ती सुधारणा योजनेंतर्गत सन २०१६-१७ ते सन २०१८-१९ या कालावधीत रस्ते-२१८, समाजमंदिरे-५, पाणीपुरवठा-१०३, पुल-४३, संरक्षण भिंत-६, शौचालय-१, स्मशानभुमी-१, गटार-१ व घाट-५ अशी एकूण ३८३ कामे करण्यात आलेली आहेत. तालुक्यातील राज्य मार्ग व जिल्हा मार्ग सुस्थितीत आहेत. त्यांची देखभाल व दुरुस्ती सार्वजनिक बांधकाम उप विभाग, डहाणू

यांच्या कडून करण्यात येत आहे.

सदर तालुक्यात १४ शासकीय आश्रमशाळा, १३ अनुदानित आश्रमशाळा व जिल्हा परिषदेच्या ४६० शाळा सुरु आहेत.

एप्रिल २०१९ पर्यंत सदर तालुक्यात २१६ पाडे व ३७२५ लाभार्थी विजेपासून वंचित होते. सदर पाड्यांचे विद्युतीकरण सौभाग्य योजनेंतर्गत करण्यात आलेले आहे, तर ४८६ ग्राहकांना विद्युत जोडणी देण्यात आलेली आहे.

डहाणू गटात ९ प्राथमिक आरोग्य केंद्रे, ६६ आरोग्य उप केंद्रे, १५ भरारी पथके व २ जिल्हा परिषद दवाखाने आहेत.

---

## पुणे शहराचे स्वच्छतेच्या सर्वेक्षणात मानांकन वाढविण्याबाबत

**(४५) ४७३१९ (१२-०७-२०१९). आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर** : सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) केंद्र शासनाच्या स्वच्छ सर्वेक्षणात देशपातळीवर गतवर्षी १० व्या क्रमांकावर असलेले पुणे शहर यावर्षी ३७ व्या क्रमाकांवर गेले असल्याचे दिनांक ७ मार्च, २०१९ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यात स्वच्छतेत गतवर्षी दुसऱ्या स्थानावर असलेले पुणे शहर आठव्या स्थानावर गेल्याने स्वच्छतेत पुणे शहर मागे जाण्यामागील कारणे काय आहेत,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन स्वच्छतेच्या सर्वेक्षणात पुण्याचे मानांकन वाढवून पुणे शहर कायमस्वरुपी स्वच्छ ठेवण्यासाठी तसेच पुणे शहराचा स्वच्छ अभियानात लोकसहभाग वाढविण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०४-११-२०१९)** : (१) होय, हे खरे आहे.

(२) स्वच्छ सर्वेक्षण २०१९ च्या निकषानुसार पुणे शहरास ओडीएफ+/++ हा

दर्जा व कचरामुक्त शहरांच्या मानांकनात ३ स्टार मानांकन मिळवता न आल्यामुळे तसेच, नागरीकांच्या सकारात्मक प्रक्रिया न आल्यामुळे पुणे शहराची कामगिरी स्वच्छ सर्वेक्षण - २०१९ मध्ये चांगली होवू शकली नाही.

(३) पुणे शहराने कचरामुक्त शहरांच्या मानांकनामध्ये किमान ३ स्टार मानांकन मिळवण्यासाठी व ओडीएफ+/++ हा दर्जा मिळविण्यासाठी तसेच नागरीकांचा सकारात्मक प्रतिसाद मिळण्यासाठी व्यापक प्रमाणात जनजागृती करण्याबाबत पुणे महानगरपालिकेस शासनामार्फत सूचना देण्यात आल्या आहेत.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## डॉ.बाबासाहेब आंबेडकर चरित्र साधने प्रकाशन समितीचे कामकाज प्रलंबित असल्याबाबत

**(४६) ४७७८७ (०५-०७-२०१९). श्री.बाळाराम पाटील, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) डॉ.बाबासाहेब आंबेडकर, महात्मा जोतिबा फुले आणि राजर्षी शाहू महाराज या महापुरुषांचे अप्रकाशित साहित्य आणि लेखन प्रकाशित करण्यासाठी शासनाच्या तीन स्वतंत्र चरित्र साधने प्रकाशन समित्यांच्या नियुक्त्या करण्यात आल्या असून त्यापैकी डॉ.बाबासाहेब आंबेडकर चरित्र साधने प्रकाशन समितीला दिनांक २४ नोव्हेंबर, २०१४ रोजी मुदतवाढ देण्यात आली होती, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त समितीच्या अध्यक्षपदी मा.उच्च व तंत्र शिक्षण मंत्री असून उपाध्यक्षपदी मा.राज्यमंत्री असतानाही मागील चार वर्षात समितीची एकही बैठक न झाल्याने समितीचे कामकाज प्रलंबित असल्याने डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या जीवनावरील एकही चरित्र प्रकाशित होवू शकले नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या अप्रकाशित साहित्य, लेखन, संशोधनावर चरित्राचे काम पूर्णत्वास नेण्यासाठी तसेच समितीच्या बैठका आयोजित करण्याबाबत कोणती

कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०८-११-२०१९) :** (१) हे अंशत: खरे आहे. पूर्वी देण्यात आलेल्या मुदतवाढीचा दिनांक २४ नोव्हेंबर, २०१४ नसून तो दिनांक २४ नोव्हेंबर, २०१३ असा आहे. तद्नंतर, दिनांक १४ डिसेंबर, २०१८ रोजीच्या उच्च शिक्षण विभागाच्या शा.नि. नुसार या तिन्ही समित्यांना दिनांक १ नोव्हेबर, २०१८ पासून पुढील तीन वर्षाकरीता मुदतवाढ देण्यात आली आहे.
(२) हे खरे नाही.
(३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## बीड शहरातील शिवाजी नगर पोलीस स्टेशन अंतर्गत महिला कर्मचाऱ्यांना अपमानास्पद वागणुक दिल्याबाबत

**(४७) ४७८०८ (१०-०७-२०१९). श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) बीड शहरातील शिवाजी नगर पोलीस स्टेशन अंतर्गत असणाऱ्या पोलीस चौकीमध्ये वरीष्ठांनी महिला कर्मचाऱ्यांना अपमानास्पद वागणुक दिल्यामुळे सदर महिला कर्मचाऱ्याने पोलीस चौकीमध्ये पंख्याला गळफास लावून आत्महत्या करण्याचा प्रयत्न केला होता, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सतर्क नागरीकांनी पोलीस चौकीचा दरवाजा दगडाने तोडून महिला कर्मचाऱ्यांचा जीव वाचविला आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, त्यानुसार संबंधित दोषी वरिष्ठांविरुध्द कारवाई करुन आत्महत्यासारखा गुन्हा करणाऱ्या महिला कर्मचाऱ्यांवर गुन्हा दाखल करण्यात आला आहे काय,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०६-११-२०१९) :** (१) नाही. दिनांक २५/०४/२०१९ रोजी पोलीस ठाणे शिवाजीनगर बीड येथील पोलीस निरीक्षक यांना पोह / १०१३ नैराळे यांनी त्यांचे मोबाईल फोनवर फोन करुन कळविले की, मपोना / १९९५

काटे यांना पोह / १०१३ नैराळे यांनी जिल्हाधिकारी कार्यालय बीड येथील पोलीस चौकीतुन बाहेर येवुन गेटवर थांबा आतमध्ये बसु नका येणारा जाणारांची वरदळ वाढलेली आहे वरिष्ठ अधिकारी आल्यास आपल्याला बोलतील असे सांगितले तेव्हा काटे यांनी तुम्ही माझे वरिष्ठ आहात काय तुम्ही तुमची डयुटी करा असे म्हणून माझे बरोबर वाद घातला आहे असे कळविले आहे.

पोलीस निरीक्षक पोलीस ठाणे शिवाजीनगर यांनी मा.जिल्हाधिकारी कार्यालय बीड येथे जावुन पोह / १०१३ नैराळे व मपोना / १९९५ काटे यांना विचारपुस केली असता त्यांनी डयुटीचे कारणावरुन किरकोळ स्वरुपाचा वाद झाला आहे, असे सांगितले तेव्हा पोलीस निरीक्षक श्री पुरभे यांनी पो.ह. १०१३ नैराळे व मपोना/१९९५ काटे यांना समजावुन सांगितले.

मपोना/१९९५ काटे यांची डयुटी बदलुन त्यांना पोलीस ठाणे सीसीटीएनएस. व पो.ह. /१०१३ नैराळे यांना पोलीस ठाणे येथे जनरल डयुटीवर नेमण्यात आले. मा.जिल्हाधिकारी कार्यालय बीड येथे गेटवर पोह/ १०१३ नैराळे व सपोना / १९९५ काटे यांचेमध्ये डयुटीचे कारणावरुन किरकोळ स्वरुपाचा वाद झाला होता.

(२) नाही. सन २०१९ लोकसभा सार्वत्रिक निवडणुक असल्याने सदर परिसरात कलम १४४ लागु असल्याने व सदर परिसरात बंदोबस्त ठेवण्यात आल्याने सदर ठिकाणी सामान्य जनतेस जिल्हाधिकारी कार्यालय परिसरात जाणेस मनाई आदेश असल्याने सदर ठिकाणी कोणीही नागरीक उपस्थित नव्हते. सदर ठिकाणी बंदोबस्त कामी नेमलेले पोलीस कर्मचारी हजर होते. पोह/१०१३ नैराळे व मपोना/ १९९५ काटे या दोघांमध्ये डयुटी वरुन किरकोळ वाद झाला होता, सदर महिला कर्मचारी यांचे बरोबर इतर प्रकार घडलेला नाही किंवा त्यांना अपमानस्पद वागणुक दिलेली नाही.

(३) होय. सदर प्रकरणी चौकशी केली असता दिनांक २५/०४/२०१९ रोजी संबंधित पो.ह/१०१३ डी. के. नैराळे, मपोना / १९९५ एम. एम. काटे, मपोना/ ८०८ व्ही.जी. दोडके नेमणुक पोलीस ठाणे शिवाजीनगर बीड यांची मा.जिल्हाधिकारी कार्यालय बीड येथील मेनगेटवर डयुटी होती.

दिनांक २५/०४/२०१९ रोजी मा.जिल्हाधिकारी कार्यालय बीड येथील मेनगेटवर पोह /१०१३ नैराळे व मपोना/१९९५ काटे या दोघांमध्ये डयुटीचे

कारणावरुन किरकोळ स्वरुपाची वादावादी झाली असून सदरचा वाद आपसात मिटलेला असल्याचे चौकशीतसिध्द झालेले आहे.

महिला कर्मचारी मपोना/ १९९५ काटे व पोह/१०१३ नैराळे यांना अज्ञांकित कक्षात बोलावुन त्यांचे म्हणणे ऐकुन त्यांना भविष्यात सुधारण्याची संधी म्हणुन महाराष्ट्र (शिक्षा व अपील) नियम १९५६ मधील नियम क्रमांक ३ नुसार ताकीद ही शिक्षा देण्यात आली आहे.

संबंधित प्रकरण हे किरकोळ स्वरुपाचे असल्याने व नमुद कर्मचारी यांचे आपसात वाद मिटल्याने गुन्हा दाखल करण्यात आलेला नाही.

(४) विलंब झालेला नाही.

---

## चंद्रपूर येथे महाऔष्णिक विद्युत केंद्रातील मेगावॅटचे संच सुरु करण्याबाबत

**(४८) ४७९४४ (०६-०७-२०१९). श्री.प्रकाश गजभिये, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात किती विद्युत प्रकल्पाचे संच बंद करण्यात आले तसेच विद्युत संच बंद असल्यामुळे किती कामगार बेरोजगार झाले व विद्युत निर्मिती बंद असल्यामुळे शासनाचे किती नुकसान झाले तसेच चंद्रपूर येथे महाऔष्णिक विद्युत केंद्रातील ५०० मेगावॅटचे ६ व ७ क्रमांकाचे २ संच बंद असल्याने उन्हाळ्यात १००० मेगावॅटची निर्मिती बंद झाली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, वीज तुटवड्यामुळे भार नियमात वाढ झाली असून पिण्याच्या पाण्याची व शेतीसाठी लागणाऱ्या पाण्याची तीव्र टंचाई निर्माण झाली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, वीज निर्मिती संच बंद होण्याची कारणे काय आहेत व या संचांची दुरुस्ती त्वरीत करुन भार नियमन रद्द करण्याबाबत शासनाने कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (३०-०८-२०१९) :** (१) व (२) महानिर्मिती कंपनीचे जूने

५ संच (एकूण क्षमता १०४० मे.वॅट) तांत्रिक वाणिज्यिकरित्या परवडणारे नसल्यामुळे संचालक मंडळाच्या निर्णयान्वये कायमस्वरुपी बंद करण्यात आले. वरील संच बंद करण्यापूर्वी, महानिर्मिती कंपनीने महाराष्ट्रातील विजेची मागणी लक्षात घेऊन भुसावळ संच क्र. ५ (५०० मे.वॅ.), कोराडी संच क्र. ८, ९ व १० (३ x ६६० मे.वॅ.), चंद्रपूर संच क्र. ८ व ९ (२ x ५०० मे.वॅ.), परळी संच क्र. ८ (२५० मे.वॅ.), या संचांची नियोजनबध्द उभारणी सुरु करुन वाणिज्यिक तत्वावर कार्यान्वयन केले. अशा प्रकारे सन २०१४ पासून महानिर्मिती कंपनीच्या औष्णिक वीज निर्मिती क्षमतेमध्ये २७३० मे.वॅ. इतकी वाढ झालेली आहे. तसेच बंद केलेल्या संचांकरीता कार्यरत महानिर्मितीचा कर्मचारी वर्ग नव्याने कार्यान्वित केलेल्या नजिकच्या औष्णिक विद्युत केंद्रांमध्ये समाविष्ट करण्यात आला. महानिर्मिती कंपनीने नव्याने कार्यान्वित केलेल्या संचांची एकूण क्षमता, कायमस्वरुपी बंद केलेल्या संचांपेक्षा जास्त असल्यामुळे कंत्राटी कामगारांना देखील कंत्राटी कामाच्या अधिक संधी उपलब्ध झालेल्या आहेत. तसेच नव्याने कार्यान्वित करण्यात आलेले संच जास्त क्षमतेचे व उच्च अथवा सुपर क्रिटीकल तंत्रज्ञानावर आधारित असल्यामुळे त्याठिकाणी पाणी व कोळशाचा वापर कमी होतो. परिणामी, किमान खर्चात जास्त वीज निर्मिती करणे महानिर्मिती कंपनीला शक्य झाले आहे. राज्यात विजेच्या मागणी एवढी विजेची उपलब्धता असल्याने राज्यात कोठेही भारनियमन करण्यात आले नाही.

(३) चंद्रपूर औष्णिक विद्युत केंद्रातील संच क्र. ६ दिनांक २०/०२/२०१९ पासून “Generator Rotor Earth Fault” मुळे बंद करावा लागला. तथापि, NTPC - तालचेर, ओडिसा येथून जनरेटर रोटर उपलब्ध करुन त्याची उभारणी यशस्वीरित्या पार पाडण्यात आली व संच दिनांक २९/०४/२०१९ रोजी कार्यान्वित करण्यात आला.

जून, २०१९ मध्ये चंद्रपूर संच क्र. ७ बाष्पक गळती व टर्बाईन संबंधिच्या काही तांत्रिक अडचणीमुळे अल्प कालावधीसाठी बंद होता. मात्र नियोजित कामे तत्परतेने पूर्ण करुन सदर संच नियमितपणे सुरु ठेवण्यात आलेला आहे. सबब सद्य:स्थितीत चंद्रपूर संच क्र. ६ व ७ ची वीज निर्मिती नियमितपणे सुरु आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्य शासनाचे विविध विभाग आणि क्षेत्रिय कार्यालयामध्ये श्रेणीनिहाय प्रवर्गातील पदे रिक्त असल्याबाबत

**(४९) ४८६५९ (१०-०७-२०१९). श्री.नरेंद्र दराडे :** सन्माननीय **वित्त मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्य शासनाचे विविध विभाग आणि क्षेत्रिय कार्यालयामध्ये श्रेणीनिहाय प्रवर्गातील किती पदे रिक्त आहेत, सदर रिक्त पदांपैकी ७० टक्के पदे बाह्य यंत्रणेमार्फत कंत्राटी पध्दतीने भरण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कंत्राटी पध्दतीने भरावयाच्या विविध पदांसाठी शैक्षणिक पात्रता, अनुभव व वयोमर्यादा याचे स्वरुप ठरविण्याबाबत तसेच रिक्त पदांचा सुधारित आकृतिबंद तयार करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (३१-१०-२०१९) :** (१) होय. माहे डिसेंबर, २०१७ अखेरच्या उपलब्ध आकडेवारीनुसार शासनाचे विविध विभाग आणि क्षेत्रिय कार्यालयांमधील गट अ, ब, क व ड या संवर्गातील एकूण ६,९८,३६३ पदांपैकी अंदाजे १,३९,१४३ पदे रिक्त होती. प्रशासकीय विभागांना जुन्या आकृतिबंधानुसार मंजूर असलेल्या पदांपैकी रिक्त असलेल्या पदांच्या ७० टक्के मर्यादेत पदे बाह्ययंत्रणेद्वारे भरण्यास, तसेच विवक्षित कामासाठी सेवानिवृत्त अधिकाऱ्यांच्या सेवा करार पध्दतीने घेण्यास फक्त एक वर्षाच्या कालावधीसाठी वित्त विभागाच्या दि. ११/१२/२०१८ च्या शासन निर्णयान्वये मुभा देण्यात आली आहे.

(२) वित्त विभाग, शासन परिपत्रक दि. २७/०९/२०१०, दि. ०२/०२/२०१३, दि. ०२/१२/२०१३ व दि. ०२/०८/२०१६ अन्वये कंत्राटी पध्दतीने कामे करण्याऐवजी बाह्ययंत्रणेद्वारे कामे करवून घेण्याच्या सूचना देण्यात आल्या असून त्यासाठी कार्यपध्दतीही स्पष्ट करण्यात आली आहे. तथापि, अशा सेवा

घेण्यासाठी शैक्षणिक पात्रता, अनुभव व वयोमर्यादा इत्यादीबाबत स्वतंत्र निकष विहित केलेले नाहीत.

तसेच सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या (खुद्द) व त्यांच्या नियंत्रणाखालील कार्यालयांच्या आस्थापनेवरील सर्व मंजूर पदांचा आढावा घेऊन तद्संबंधीच्या सुधारित आकृतिबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेणे आवश्यक ठरविण्यात आले आहे. त्यानुसार संबंधित प्रशासकीय विभागांनी त्यांचे सुधारीत आकृतिबंधाचे प्रस्ताव वित्त विभागाकडे सादर करणे आवश्यक आहे. त्यानुसार आतापर्यंत ५ मंत्रालयीन प्रशासकीय विभाग व ३४ क्षेत्रिय कार्यालयांच्या सुधारीत आकृतिबंधाच्या प्रस्तावांना उच्चस्तरीय सचिव समितीने अंतिम मंजुरी दिली आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात शासकीय धोरणानुसार स्थानिक स्वराज्य संस्थांकडून विभागातील सुधारणेबाबत

**(५०) ५०३२२ (०९-०७-२०१४). श्री.अशोक उर्फ भाई जगताप :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात शासकीय धोरणानुसार स्थानिक स्वराज्य संस्थांकडून संबंधित विभागातील सुधारणेबाबत सूचना मागविण्याची प्रथा आहे, मात्र त्या सुचनांची शासकीय पातळीवर नोंद न घेतल्याचे माहे मार्च, २०१४ मध्ये त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, झेडपीच्या प्रत्येक विभागातील त्रुटी आणि त्यातील अपेक्षित सुधारणांबाबत सूचना तयार करण्याचे काम हाती घेण्यात आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, झेडपीतील कामात शासनाने कोणत्या सुधारणा केल्या आहेत,

(४) तसेच सुचनांची नोंद न घेतलेल्या संबंधित अधिकाऱ्यांवर वा कर्मचाऱ्यांवर शासनाने काय कार्यवाही केली वा करण्यात येणार आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०७-११-२०१९) :** (१) हे खरे नाही.

(२), (३), (४) व (५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**विधान भवन :**
**मुंबई.**

**श्री.राजेंद्र भागवत**
**सचिव (कार्यभार),**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

---

मुद्रणपूर्व सर्व प्रक्रिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.